**मोटार वाहन विभागातील नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांच्या यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे येथील ५६ दिवसीय प्रशिक्षणास व त्यापोटी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शिकाना १२१९/प्र.क्र.१४/परि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ सप्टेंबर २०२०

वाचा : -

**परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का-१३/प्रशिक्षण-१४/ २०१९/ जा.क्र.१७५६५, दि.०७.१२.२०१९**

प्रस्तावना :-

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ८३२ सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांना महाराष्ट्रातील विविध प्रशिक्षण संस्थांमध्ये दोन वर्षाचे प्रशिक्षण आणि कार्यानुभव देण्याचे प्रस्तावित आहे.त्यानुषंगाने यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे येथे प्रत्येकी १०० प्रशिक्षणार्थीच्या एकुण चार तुकड्यांमध्ये एकुण ४०० सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना आठ आठवड्यांचे (५६ दिवस) प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यापैकी पहिल्या तुकडीतील १०० सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांच्या आठ आठवड्यांच्या (५६ दिवस) प्रशिक्षणास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ८३२ सहाय्यक मोटार वाहन निरीक्षकांपैकी पहिल्या तुकडीतील १०० सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांच्या दि.२३.१२.२०१९ ते १६.०२.२०२० या कालावधीत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे येथे घेण्यात आलेल्या प्रशिक्षणास व त्यासाठी प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन रु.३३००/- या प्रमाणे १०० अधिका-यांचे ५६ दिवसांसाठी = रु. ३३०० प्रतिदिन X १०० प्रशिक्षणार्थी X ५६ दिवस = रु.१,८४,८०,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चौ-याऐंशी लक्ष ऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर,(०१)(०२) मोटार वाहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण, (कार्यक्रम) (२०४१ ०३४१) १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थीक वर्षाकरीता केलेल्या तरतुदींमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२९/१४६१, दि.०६.०१.२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७४/२०२०/व्यय-८, दि.२५.०८.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२१६०७५१८२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.09.22 16:10:37 +05'30'

**( द.ह. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मंत्री/राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/प्रशासन/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) उप सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
९) उप/सह सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०) कक्ष अधिकारी/अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती- (परि-४).